**राज्यातील महिलांच्या सक्षमीकरणासाठी "आदिशक्ती अभियान" राबविणे व "आदिशक्ती पुरस्कार" प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-आदिपु-२०२५/प्र.क्र.१५ /का-१०**
**नविन प्रशास नभवन, तिसरा मजला,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक - २२ मे, २०२५.

संदर्भ:- १. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णयक्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.६२/का-०८, दि.७.५.२०२१.
२. ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र.झेडपीए २०१३/प्र.क्र.७६/पंरा-१, दि.१९.१.२०२१.

**प्रस्तावना** -

महाराष्ट्र हे राज्यातील गरजु नागरिकांसाठी अनेक लोकाभिमुख योजना राबविणारे पुरोगामी राज्य आहे. राज्यातील एकूण लोकसंख्येपैकी सुमारे ६०% महिला व बालके आहेत. राज्य शासनाच्या माध्यमातून राज्यामध्ये महिलाभिमुख योजनांची अंमलबजावणी करण्यात येत आहे. शासनाकडून राबविण्यात येणाऱ्या सर्व महिलाभिमुख योजनांचा लाभ समाजातील शेवटच्या घटकातील महिलांपर्यंत पोहचविणे हा प्रमुख उद्देश ठेवून तसेच राज्यातील महिलांच्या आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व आरोग्य विषयक समस्यांबाबत समाजात संवेदनशीलता निर्माण करणे व जनजागृतीच्या माध्यमातून चळवळ निर्माण करणे, अभियानाच्या माध्यमातून महिलांच्या समस्यांवर कायमस्वरुपी उपाययोजना करणे तसेच महिलांचे सर्वांगीण सक्षमीकरण करण्याच्या दृष्टीने विशेष अभियान राबविण्याची व आदिशक्ती अभियान उत्कृष्टपणे राबविणाऱ्या ग्रामपंचायतींना पुरस्कार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

राज्यातील महिला व बालकांची मोठया प्रमाणात असलेली लोकसंख्या व राज्यातील महिलांच्या जीवनात येणाऱ्या समस्या व त्यांच्या सबलीकरणासंदर्भात भेडसावणाऱ्या समस्या ज्यामध्ये प्रामुख्याने महिलांच्या अर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व आरोग्य विषयक समस्या जाणुन घेऊन त्यांचा सर्वांगिण विकास होण्याच्या दृष्टीने सन २०२५-२६ पासून राज्यात आदिशक्ती अभियान राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. या मोहिमेद्वारे महिलांसाठी राज्यात राबविण्यात येत असलेल्या विविध शासकीय योजना/उपक्रम/कार्यक्रम इ. बाबत आवश्यक व उपयुक्त माध्यमाद्वारे प्रचार प्रसिध्दी देऊन जनमाणसांमध्ये याबाबतची जनजागृती करण्यात येईल. यासाठी ग्रामस्तरीय समित्यांना "आदिशक्ती पुरस्कार" देऊन गौरविण्यात येईल.

२. आदिशक्ती अभियानाचा उद्देश व अभियानाची अंमलबजावणी खालीलप्रमाणे करण्यात येईल:-

**१) उद्देश -:**

१) ग्राम चळवळीतून महिलांच्या समस्यांचे महत्व जाणून घेणे व महिलांच्या आरोग्य समस्यांचे संवेदनशीलपणे निवारण करणे.
२) कुपोषण, बालमृत्यू, मातामृत्यूचे प्रमाण कमी करण्याकरीता सक्षम समाज निर्माण करणे.

३) लिंगभेदात्मक विचारसरणीला आव्हान देऊन किशोवयीन मुलींमध्ये शिक्षणाचे प्रमाण वाढविणे व बालविवाह मुक्त समाज निर्माण करणे.
४) लैंगिक, शारीरिक अत्याचार ला प्रतिबंध करून हिंसाचार मुक्त कुटुंब व समाज निर्माण करणे व अनिष्ट रुढींचे निर्मुलन करणे.
५) महिला नेतृत्वाला सक्षम करून पंचायत राज पद्धतीमध्ये त्यांचा सहभाग वाढविणे.
६) महिला, किशोरी यांना शिक्षण, रोजगार, निर्णय व हक्क यामध्ये समान संधी निर्माण करून शासकीय योजनांचा लाभ व स्वयंरोजगाराच्या संधींच्या माध्यमातून आर्थिक उन्नत स्त्री संकल्पना राबविणे.

**२) अभियानाची कार्यप्रणाली :-**

राज्यात सदरचे अभियान यशस्वीपणे राबविण्यासाठी ग्रामस्तर, तालुकास्तर, जिल्हास्तर, विभागस्तर व राज्यस्तरावर विशेष समित्यांचे गठण करण्यात येईल. सदरच्या समित्या खालीलप्रमाणे असतील :-

**अ. ग्रामस्तर समिती :-**

| | | | |
|---|---|---|---|
| १) | ग्राम सभेने निवडलेली महिला प्रतिनिधी | - | अध्यक्ष |
| २) | पुरुष प्रतिनिधी (महिला व बाल विकास क्षेत्रात सक्रिय) | - | सदस्य |
| ३) | पुरुष प्रतिनिधी (सामाजिक क्षेत्रात सक्रिय) | - | सदस्य |
| ४) | आशा स्वयंसेविका | - | सदस्य |
| ५) | महिला शिक्षिका/ महिला तलाठी /महिला पोलीस पाटील | - | सदस्य |
| ६) | ग्रामसेवक/ ग्राम विकास अधिकारी | - | सदस्य |
| ७) | पोलीस पाटील | - | सदस्य |
| ८) | अंगणवाडी सेविका | - | सदस्य सचिव |

**समिती अध्यक्ष / अशासकीय सदस्य निवडीचे निकष :-**

१. सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर १५ दिवसांच्या आत राज्यातील प्रत्येक ग्रामपंचायत स्तरावर विशेष ग्रामसभा घेऊन ग्रामस्तरीय समिती स्थापन करण्यात यावी.
२. महिला व बाल विकास क्षेत्रामध्ये किमान ३ वर्षे उत्कृष्ट/ उल्लेखनिय कार्य केलेली महिला असावी.
३. महिलांच्या समस्या व प्रश्नांबाबत जाणीव व संवेदनशिलता असावी.
४. बाल विवाह प्रतिबंध, बाल मजूरी प्रतिबंध, हुंडा निर्मुलन, कौटुंबिक हिंसाचारास प्रतिबंध, बालकांचे व महिलांचे लैंगिक, आर्थिक, मानसिक, शारिरीक शोषण प्रतिबंध, कामाच्या ठिकाणी महिलांवर होणाऱ्या लैंगिक छळास प्रतिबंध, अनैतिक व्यापार प्रतिबंध, आरोग्य व वैद्यकिय सुविधा, शिक्षण व व्यवसाय प्रशिक्षण, आर्थिक सक्षमता या सारख्या कार्यामध्ये उत्स्फुर्तपणे सहभागी झालेली महिला असावी.
५. महिलेवर कोणत्याही प्रकारचा गुन्हा दाखल झालेला नसावा.
६. ग्रामस्तरीय समितीमध्ये दोन सदस्य महिला दूत / ग्राम दूत म्हणून काम करतील. समितीची सदस्य सचिव एक महिला दूत असेल व दोन पुरुष सदस्यांपैकी एका पुरुष सदस्याची निवड ग्राम दूत म्हणून करावी. ग्रामस्तर समिती अध्यक्षांना महिला दूताची जबाबदारी देण्यात येऊ नये.
७. महिलादूत / ग्रामदूत तसेच ग्राम स्तर समितीच्या उर्वरीत सदस्यांना अभियान राबविण्याचे प्रशिक्षण महात्मा गांधी प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्या माध्यमातून जिल्हास्तरावरून देण्यात येईल. या प्रशिक्षणासाठी आवश्यक ती प्रशिक्षण पुस्तिका (Training Module) महिला व बाल विकास आयुक्तालयाने तयार करावी.

८. ग्रामस्तर समितीची बैठक १५ दिवसातून एकदा घेण्यात येईल.
९. ग्रामस्तर समितीच्या पदाधिकाऱ्यांना संबंधित ग्रामपंचायत प्रशासन स्वतंत्र ओळखपत्र देईल. ओळखपत्राचा नमुना महिला व बाल विकास आयुक्तालयाने अंतिम केल्याप्रमाणे राहील.
१०. पुरुष प्रतिनिधींची निवड करताना प्राधान्याने सेवानिवृत्त शिक्षक, सेवानिवृत्त पोलीस कर्मचारी अथवा सैन्यदलातील सेवानिवृत्त व्यक्तींना सदस्य म्हणून प्राधान्य द्यावे.
११. महिलांचा विकास, सक्षमीकरण, आरोग्य, शिक्षण व पर्यावरण घटकांवर ग्रामस्तरीय समितीने काम करणे अनिवार्य राहील.

**ब. तालुकास्तर समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १. बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण) (ज्येष्ठतम) | - | अध्यक्ष, |
| २. तालुक्यातील जेष्ठ अंगणवाडी पर्यवेक्षिका | - | सदस्य, |
| ३. तालुक्यातील आरोग्य अधिकारी(महिला आरोग्य अधिकाऱ्यास प्राधान्य) | - | सदस्य, |
| ४. महिलांच्या क्षेत्रात काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्थेचे प्रतिनिधी (महिला) | - | सदस्य, |
| ५. तालुका संरक्षण अधिकारी (कनिष्ठ) | - | सदस्य सचिव. |

तालुकास्तरीय समितीची बैठक १५ दिवसातून एकदा घेतली जाईल. प्रस्तुत बैठकीमध्ये प्रामुख्याने मागील १५ दिवसातून एकदा ग्रामस्तरीय समितीने केलेल्या कामाचा आढावा घेतला जाईल व त्यानुसार ग्रामस्तरीय समितीला पुढील कामासंदर्भात दिशानिर्देश दिले जातील.

**क. जिल्हास्तर समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १. जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष, |
| २. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. | - | सदस्य, |
| ३. शिक्षणाधिकारी (प्रा.), जि.प. | - | सदस्य, |
| ४. जिल्हा आरोग्य अधिकारी, जि.प. | - | सदस्य, |
| ५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | - | सदस्य, |
| ६. जिल्हा कार्यक्रम अधिकारी, महिला व बाल विकास, जि.प. | - | सदस्य सचिव. |

जिल्हास्तरीय समितीची बैठक दर महिन्यातून एकदा घेतली जाईल. यामध्ये प्रामुख्याने तालुकास्तरीय समितीकडून प्राप्त झालेल्या कामाच्या अहवालावर चर्चा होईल. तालुकास्तरीय समितीकडून प्राप्त झालेल्या कामाच्या अहवालावर जिल्हास्तरीय समिती मध्ये चर्चा करुन घेतलेल्या निर्णयासंदर्भात जिल्हा कार्यक्रम अधिकारी, महिला व बाल विकास, जिल्हा परिषद हे सदस्य सचिव या नात्याने प्रस्तुत विषय जिल्हाधिकारी यांच्या मान्यतेने अहवालाच्या स्वरुपामध्ये राज्यस्तरीय समितीकडे सादर करतील.

**ड. विभागस्तर समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे | - | अध्यक्ष, |
| २. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ | - | सदस्य, |
| ३. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग | - | सदस्य, |
| ४. विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास (सर्व) | - | सदस्य, |
| ५. उपायुक्त (अंगणवाडी), एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई | - | सदस्य, |
| ६. उपायुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास, पुणे | - | सदस्य सचिव. |

विभागस्तरीय समितीची बैठक दर महिन्यातून एकदा घेतली जाईल. यामध्ये प्रामुख्याने जिल्हास्तरीय समितीकडून प्राप्त झालेल्या कामाच्या अहवालावर चर्चा होईल. आयुक्त महिला व बाल विकास पुणे,

राज्यस्तरीय कामकाजाचा अहवाल (अभियानाच्या फलनिष्पत्तीबाबत) महिला व बाल विकास विभागास नियमितरीत्या सादर करतील.

**इ. राज्यस्तर समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १. मा.मंत्री (महिला व बाल विकास) | - | अध्यक्ष, |
| २. मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास) | - | सदस्य, |
| ३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य, |
| ४. प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य, |
| ५. प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य, |
| ६. सचिव/ प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य, |
| ७. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे | - | सदस्य सचिव. |

राज्यस्तरीय समितीची बैठक आवश्यकतेनुसार आयोजित केली जाईल. या समितीमार्फत सदर अभियानाच्या अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात येईल. तसेच, “आदिशक्ती अभियान” व “आदिशक्ती पुरस्कार” यांच्या अंमलबजावणी बाबत आवश्यकतेनुसार काही बदल/ सुधारणा आवश्यक असल्यास त्याबाबतचा निर्णय राज्यस्तरीय समितीमार्फत घेण्यात येईल.

**ग्रामस्तरीय समितीची कार्यकक्षा / अभियानाचे प्रमुख घटक :-**

**अ) महिला विकास विषयक :-**

१. बाल विवाह प्रतिबंधक अधिकारी (ग्राम सेवक ) व सहायक बाल विवाह प्रतिबंधक अधिकारी (अंगणवाडी सेविका) यांच्या मदतीने गावामध्ये बाल विवाहाच्या घटना घडणार नाहीत याची समितीने दक्षता घ्यावी. आवश्यकता असल्यास जोखिमग्रस्त किशोरवयीन मुलींच्या कुटुंबाचे कौटुंबिक समुपदेशन अंगणवाडी सेविकेच्या मदतीने समिती सदस्यांनी करण्याचा प्रयत्न करावा.

२. गाव पातळीवर हुंडा घेण्याच्या प्रथेस प्रतिबंध बसेल अशा प्रकारची वातावरण निर्मिती होईल असा समितीने सातत्याने प्रयत्न करावा. लोकसहभागातून सामुहिक विवाह सोहळे आयोजित करण्याचा समितीने प्रयत्न करावा.

३. गावातील महिला कौटुंबिक हिंसाचारास बळी पडू नयेत यासाठी जनजागृती कराव. तसेच, कौटुंबिक हिंसाचाराला बळी पडलेल्या महिलेस Domestic Violence Act अंतर्गत नेमलेल्या तालुका संरक्षण अधिकाऱ्याच्या मदतीने न्याय मिळवून देण्याचा समितीने प्रयत्न करावा.

४. गावातील एकल महिला, विधवा, परित्यक्ता व निराधार महिलांच्या सुरक्षिततेसाठी प्रयत्न करावा.

५. महिला व बालकांशी संबंधित असलेल्या शासकीय योजनांचा प्रचार व प्रसार करण्यासाठी समितीने कटीबध्द रहावे.

६. अल्पवयीन मुलींचे व महिलांचे लैंगिक शोषण होणार नाही याबाबतची दक्षता समितीने घ्यावी.

७. केंद्र शासनाच्या बेटी बचाओ बेटी पढाओ योजना, राज्य शासनाच्या मुख्यमंत्री माझी लाडकी बहीण योजना, लेक लाडकी योजना, प्रधानमंत्री मातृवंदना योजना या योजनांचा पात्र लाभार्थ्यांना जास्तीत जास्त लाभ मिळवून द्यावा.

**ब) महिला सक्षमीकरण विषयक :-**

१. गावातील जास्तीत जास्त गरजू महिलांना महिला बचत गटाच्या माध्यमातून मिळणाऱ्या लाभांची उपयुक्तता पटवून देण्यासाठी समितीने प्रयत्न करावा. महिला बचत गटांची निर्मिती व सक्षमीकरणासाठी प्रयत्न करावा.

२. १० वी किंवा १२ वी उत्तीर्ण मुलींना नजीकच्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या मदतीने कौशल्य विकासाचे प्रशिक्षण उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न समितीने करावा. अशा मुलींना विशेष सोयीसुविधा उपलब्ध करून देण्यासाठी प्रयत्नशील रहावे. प्रशिक्षित मुलींना/ महिलांना स्वयंरोजगार निर्माण करण्यामध्ये समितीने प्रोत्साहित करावे व त्यांच्यामध्ये आर्थिक साक्षरता निर्माण करण्यासाठी प्रयत्न करावेत.

३. महिलांकडे मोबाईल फोन असणे व त्यांच्या नावे बँकेमध्ये स्वतंत्र अथवा संयुक्त खाते असणे महिलांच्या आर्थिक सक्षमीकरणाचे द्योतक समजले जाते. तसेच, "घर दोघांचे" या संकल्पनेवर आधारीत ग्रामपंचायत नमुना नं.८ मध्ये वैयक्तिक घराची मालमत्ता स्त्री आणि पुरुषाच्या नावे करण्याची मोहिम समितीने ग्रामपंचायतीच्या मदतीने राबविल्यास व शेतजमिनीच्या खरेदी विक्री व्यवहारातदेखील ७/१२ वर पत्नीचे नाव समाविष्ट केल्यास खऱ्या अर्थाने महिलांचे आर्थिक, कौटुंबिक व सामाजिक सक्षमीकरण होईल. यासाठी समितीने मोठया प्रमाणावर जनजागृती करावी. विधवा, परित्यक्त्या, घटस्फोटीत, एकल महिला यांना वारस प्रमाणपत्र, मालमत्ता विषयक हक्काच्या कायदेशीर नोंदी करण्यासाठी समिती मदत करेल.

४. गाव पातळीवरील प्रशासनात व राजकारणात महिलास्नेही वातावरण निर्मिती करणे तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये महिलास्नेही संवेदनशिलता वाढविण्याकरिता ग्रामस्थांसाठी महिलास्नेही वातावरण निर्मिती प्रशिक्षणाचे नियोजन महात्मा गांधी प्रशिक्षण संस्थेच्या माध्यमातून महिला व बाल विकास आयुक्तालयाने करावे.

**क) जाणीव जागृती :-**

१. अभियानामध्ये स्त्रियांच्या सर्वांगीण विकासासाठी जाणीव जागृती निर्माण करण्याकरीता महिला व मुलींसाठी अस्तित्वात असणारे कायदे, योजना व त्यांची अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणा व सुविधा याबाबत प्रबोधन करणे.

२. विविध माध्यमांचा वापर करुन चौक सभा, जागर फेरी, प्रभात फेरी, पथनाट्य, कार्यशाळा, व्याख्यानमाला आणि विविध स्पर्धांचे आयोजन करण्यात यावे.

**ड) ग्राम सुरक्षा यंत्रणा कार्यरत करणे :-**

१. ग्राम स्तरावर आरोग्य, शिक्षण व संरक्षणाशी संबंधित असणाऱ्या समित्यांना (गाव बाल संरक्षण समिती, महिला आरोग्य व पोषण समिती महात्मा गांधी तंटा मुक्त ग्राम समिती शालेय व्यवस्थापन समिती सखी सावित्री समिती इत्यादि) कार्यरत केले जाईल.

२. जिल्हा व तालुका स्तरावर महिला विकासाकरीता कार्यरत असलेल्या संस्था व विभाग यांचा ग्रामीण संघटना व समित्यांशी समन्वय करून देणे.

३. महिलांच्या सुरक्षितता व सहकार्याकरीता कार्यरत असणाऱ्या यंत्रणांना उत्तरदायी बनवून ग्राम स्तरावर भेटी वाढविणे.

**इ) सामाजिक सुरक्षितते करीता कार्यक्रम :-**

१. विशेष गरज असणाऱ्या महिला (अंध, अपंग, विकलांग) यांना शासनाच्या योजनांमध्ये प्राधान्य देऊन योजना लागू करणे,

२. तसेच, अनाथ, वृद्ध, एकल महिला, कुमारी माता, विधवा किंवा दारिद्र्य रेषेखालील महिला यांना शासनाच्या योजनांचा लाभ करुन देणे,

३. कौटुंबिक व सामाजिक हिंसाचार प्रतिबंधाकरीता संवेदनात्मकरित्या कार्य करणे व गावातील अनिष्ट चालीरीती/ प्रथा यांना प्रतिबंध करणे,

४. गावातील स्त्री-पुरुष जन्मदर सुधारणे व स्त्री जन्माच्या स्वागताकरीता कार्यक्रम घेणे,

५. व्यसन मुक्तीकरीता प्रयत्न करणे,
६. ग्राम स्तरावरील महिला व बालकांकरिता गावातील असुरक्षित ठिकाणे शोधून सुरक्षिततेकरीता उपाय योजना करणे,
७. लिंग भेदात्मक विचारसरणीला सभा व जनजागृतीच्या माध्यमातून प्रतिबंध करणे.

**ई) आरोग्य विषयक :-**

१. आशा स्वयंसेविका / आरोग्य सेविका / समुदाय आरोग्य अधिकारी (CHO) यांच्या मदतीने गाव पातळीवर वर्षातून दोन वेळा गरोदर माता, स्तनदा माता व किशोरवयीन मुलींच्या हिमोग्लोबिन चाचणी/ आरोग्य तपासणी चे आयोजन करण्यास समितीने मदत करावी, जेणेकरुन गरोदर माता, स्तनदा माता व किशोरवयीन मुली ॲनिमिया मुक्त (रक्तक्षय) होतील. तसेच, महिलांना इतर आजार असल्यास महात्मा फुले जीवनदायी योजनेचा लाभ घेण्यास सहाय्य करावे.
२. आशा स्वयंसेविका /दाई / आरोग्य सेविका यांच्या मदतीने गाव पातळीवर एकही गृह प्रसूती (Home delivery) होणार नाही याची दक्षता समितीने घ्यावी. तसेच, गरोदर मातांच्या आवश्यक असलेल्या चार आरोग्य तपासण्या होतात किंवा कसे याची खात्री समितीने आशा स्वयंसेविका / अंगणवाडी सेविकेच्या मदतीने करावी.
३. गावातील महिला व मुलींना सॅनिटरी पॅड वापरण्याबाबत व मासिक पाळी सुरु होणे व बंद होणे या प्रक्रियेबाबत मार्गदर्शन करावे व त्यांच्यामध्ये जनजागृती करावी.
४. लिंग निर्धारण ( Sex Determination) करण्याच्या वृत्तीस आळा बसेल अशा प्रकारची वातावरण निर्मिती करण्याचा प्रयत्न समितीने करावा व या माध्यमातून गावातील स्त्री-पुरुष प्रमाण (जन्मदर) सुधारण्यासाठी हातभार लावावा.
५. गावातील प्रत्येक गरोदर महिलेची नोंद करणे व गर्भारपणामध्ये असणाऱ्या पोषण व आरोग्याशी संबंधित योजनांचा लाभ मिळवून देणे.
६. गर्भारपणामध्ये आवश्यक लसीकरण पूर्ण करणे. पूरक पोषण आहाराकरीता जाणीव जागृती व प्रकरण निहाय प्रत्यक्षात काळजी घेणे.
७. प्रत्येक गर्भवतीची प्रसूती दवाखान्यातच होईल यासाठीचे नियोजन करणे माता व बाल मृत्यू प्रमाण कमी करणे.
८. प्रसूती पश्चात काळजी व संरक्षणाकरीता कुटुंबास उत्तरदायी बनविणे
९. कुपोषणास प्रतिबंध करणे.
१०. नवजात बालकाची योग्य ती निगा व लसीकरण पूर्ण करणे.
११. विविध साथीच्या रोग नियंत्रणाकरीता यंत्रणे सोबत सक्षम समन्वय साधणे.

**उ) शिक्षण विषयक :-**

१. किशोरवयीन मुली नियमितपणे शाळेत जातील व त्यांच्या शिक्षणामध्ये खंड पडणार नाही याची दक्षता समितीने घ्यावी.
२. शाळा बाह्य मुला-मुलींचे प्रमाण संपविणे.
३. पालक-शिक्षक विद्यार्थी सभा बळकट करून मुलींच्या शाळा गळतीचे प्रमाण कमी करणे.
४. उच्च गुण प्राप्त मुलींच्या सत्कार समारंभाचे आयोजन करणे.
५. ग्राम स्तरावर वाचनालय व अभ्यासिकांच्या माध्यमातून महिलांचे सक्षमीकरण करणे.
६. अर्थार्जनासाठी महिलांमध्ये आर्थिक साक्षरता निर्माण करुन त्यांना व्यवसायाभिमुख प्रशिक्षण घेण्यासाठी प्रोत्साहित करणे.

**ऊ) पर्यावरण विषयक :-**

१. शाश्वत नैसर्गिक संसाधन व्यवस्थापन, हवामान बदल अनुकूलन आणि आपत्ती व्यवस्थापन यामध्ये महिलांची निर्णय घेण्याची व नेतृत्व करण्याची क्षमता वाढविण्यासाठी समिती प्रयत्न करेल. यासाठी महिलांचे उपजत ज्ञान व कौशल्य यांचा सुयोग्य वापर करेल.
२. अंगणवाडी केंद्र परिसरामध्ये किंवा परिसराजवळ पुरेशी जागा उपलब्ध असेल तर ग्राम पंचायत / कृषी सहायक / कृषी विज्ञान केंद्र यांच्या मदतीने परसबागेची निर्मिती करण्यासाठी समितीने अंगणवाडी सेविकेस सर्वोतोपरी सहकार्य करावे.
३. ग्राम पंचायत कार्यक्षेत्रातील खुल्या सार्वजनिक जागेवर ग्राम पंचायतीच्या वतीने नव्याने वृक्ष लागवड करण्याचा प्रयत्न करावा व केलेल्या वृक्ष लागवडीची सातत्याने जोपासना करावी.

**३) ग्राम स्तरावर केलेल्या उत्कृष्ट कामाच्या मुल्यमापनाचे निकष व द्यावयाचे गुण :-**

आदिशक्ती अभियान राबविण्यासाठी ग्रामस्तर समितीस निश्चित करुन देण्यात आलेल्या कामांचे/ जबाबदाऱ्यांचे वार्षिक मुल्यमापन करण्याची कार्यपध्दती सोबतच्या परिशिष्टानुसार असेल.

**आदिशक्ती अभियानाची नियमावली :-**

१. सर्व ग्रामपंचायतींनी या अभियानात सहभागी होणे अनिवार्य राहील.
२. या अभियानात सहभागी होण्यापूर्वी ग्रामपंचायतींमार्फत विशेष ग्राम सभा घेऊन प्रत्येक ग्रामस्थाला विशेषत: महिलांना या अभियानाबाबबत संपूर्ण माहिती देणे बंधनकारक असेल.
३. आदिशक्ती पुरस्कारासाठी एकाच ग्रामपंचायतीची निवड करण्यात यावी. जर एकापेक्षा जास्त ग्रामपंचायतींना समान गुण प्राप्त झाले असतील तर पुरस्कारासाठी असलेल्या चार विषयात (बालविवाह मुक्त, स्त्री हिंसाचार मुक्त, मुलींच्या शिक्षणाचे प्रमाण व कुपोषण मुक्त) ज्या ग्रामपंचायतीला जास्त गुण असतील त्या ग्रामपंचायतीची पुरस्काराकरिता निवड करण्यात येईल.
४. प्रत्येक स्तरावरील तपासणी समितीने त्यांना नेमून दिलेल्या प्रत्येक ग्रामपंचायतीची तपासणी कधी व किती कालावधीत केली याची नोंद संबंधित ग्रामपंचायतीच्या शेरे पुस्तकात करावी.
५. तपासणी समितीच्या प्रत्येक सदस्याने आपल्यावरील जाबाबदारीची जाणीव ठेवून ग्रामपंचायतीने केलेल्या कामाची तपासणी व मूल्यांकन निपक्षपातीपणे करावे.
६. अभियानांतर्गत प्रत्येक स्तरावर दिलेला निर्णय अंतिम असेल, त्याकरीता कोणत्याही स्तरावर अपील करता येणार नाही.
७. पुरस्कार प्राप्त ठरलेल्या ग्रामपंचायती पुढील वर्षी पुन्हा स्पर्धेत भाग घेऊ शकतील. परंतु त्यांना पुढील पाच वर्ष अभियानांतर्गत कोणत्याही स्तरावर पुरस्कार देय राहणार नाही. परंतु, अशा ग्रामपंचायतींना विशेष प्रमाणपत्र देण्यात येईल.
८. तपासणी समितीमध्ये तपासणी दरम्यान दोन तृतियांश सदस्य तपासणी करण्याकरिता पूर्ण वेळ हजर असणे आवश्यक असेल.

**४) पुरस्कार योजना : आदिशक्ती पुरस्कार.**

१. तालुक्यामध्ये **"आदिशक्ती अभियान"** उत्कृष्टपणे राबविणाऱ्या तीन ग्रामस्तरीय समित्यांची/ ग्रामपंचायतींची निवड तालुकास्तर समिती करेल. तालुकास्तरीय समिती सदस्य एकत्रितपणे वरील तीन ग्रामपंचायतींना प्रत्यक्ष भेटी देऊन त्यांनी केलेल्या कामाचे भौतिक निरीक्षण करतील व नंतरच तालुकास्तरीय समिती निवड केलेल्या तीन ग्रामपंचायतींना पुरस्कार जाहीर करेल.

२. प्रत्येक तालुक्यातील प्रथम, द्वितीय व तृतीय पुरस्कार मिळालेल्या ग्रामस्तरीय समित्यांचे/ ग्रामपंचायतींचे तालुकानिहाय प्रस्ताव जिल्हास्तरीय समिती एकत्र करेल व या निवडलेल्या विजेत्यांमधून गुणवत्तेनुसार जिल्हास्तरीय प्रथम, द्वितीय व तृतीय पुरस्कार जाहीर करेल.

३. प्रत्येक जिल्हयातील प्रथम रस्कार मिळालेल्या ग्रामस्तरीयद्वितीय व तृतीय पु ,समित्यांचेग्रामपंचायतींचे / जिल्हानिहाय प्रस्तावविभागस्तरीय समिती एकत्र करेल व या निवडलेल्या विजेत्यांमधून गुणवत्तेनुसार राज्यस्तरीय प्रथम.द्वितीय व तृतीय पुरस्कार जाहीर करेल ,

**आदिशक्ती पुरस्काराची रक्कम खालीलप्रमाणे राहील :-**

| | | | |
|---|---|---|---|
| १) **तालुकास्तरीय पुरस्कार** | - | **प्रथम -** | **रु. १ लक्ष** |
| | | **द्वितीय -** | **रु. ५० हजार** |
| | | **तृतीय -** | **रु. २५ हजार** |
| २) **जिल्हास्तरीय पुरस्कार** | - | **प्रथम -** | **रु. ५ लक्ष** |
| | | **द्वितीय -** | **रु. ३ लक्ष** |
| | | **तृतीय -** | **रु. १ लक्ष** |
| ३) **राज्यस्तरीय पुरस्कार** | - | **प्रथम -** | **रु. १० लक्ष** |
| | | **द्वितीय -** | **रु. ७ लक्ष** |
| | | **तृतीय -** | **रु. ५ लक्ष** |

**सदर अभियान व पुरस्कारासाठी अंदाजे ₹१०.५० कोटी इतका वार्षिक खर्च अपेक्षित असून प्रस्तुत अभियानाकरिता महिला व बाल विकास विभागास प्राप्त होणाऱ्या नियतव्ययामधून सदर निधी अर्थसंकल्पीत करण्यात येईल. सदर खर्च पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर पुरस्काराच्या २२३५ २४४८ या संगणक सांकेतांकाखाली निश्चित करण्यात आलेल्या लेखाशीर्षाचे नाव बदलून "पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर पुरस्कार व विभागामार्फत देण्यात येणारे विविध पुरस्कार" असे करुन सदर लेखाशिर्षाखाली अहिल्याबाई होळकर पुरस्कार व आदिशक्ती पुरस्कार यासाठी एकत्रित निधी अर्थसंकल्पीत करण्यात येईल.**

**पुरस्काराच्या रकमेचा विनियोग-**

तालुकास्तरीय, जिल्हास्तरीय व राज्यस्तरीय पुरस्काराची रक्कम ग्रामपंचायतीस प्रदान करण्यात येईल. ग्रामपंचायतीने पुरस्काराच्या रकमेचा विनियोग ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्र.झेडपीए २०१३/प्र.क्र.७६/पंरा-१, दिनांक १९.०१.२०२१ नुसार महिला व बाल विकासासाठी निश्चित करुन दिलेल्या कामांवर करावा. सदर अभियानांतर्गत परिशिष्ट-अ मध्ये नमूद बाबींसंदर्भात दि.०१ जानेवारी ते दि.३१ डिसेंबर या कालावधीत झालेल्या कामांचे/ प्रगतीचे मुल्यांकन फेब्रुवारीअखेर पूर्ण करण्यात यावे. तालुकास्तरीय पुरस्कारांचे जिल्हास्तरावर, जिल्हास्तरीय पुरस्कारांचे विभाग स्तरावर व राज्यस्तरीय पुरस्कारांचे राज्यस्तरावर आयोजन करुन पुरस्काराचे वितरण शक्यतो मार्चच्या पहिल्या आठवड्यात करण्यात यावे.

३. **सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर १५ दिवसांच्या आत राज्यातील प्रत्येक ग्रामपंचायत स्तरावर विशेष ग्रामसभा घेऊन ग्रामस्तरीय समिती स्थापन करण्याची कार्यवाही करण्यात यावी.**

४. सदर शासन निर्णय दिनांक ०६ मे, २०२५ रोजी आयोजित मा.मंत्रिपरिषदेच्या बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२२१७२४३४०८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9ef c83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34 F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.05.22 17:26:17 +05'30'

( वि.रा.ठाकूर )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन विभाग) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव,
१३. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), विधानभवन, मुंबई,
१५. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), विधानभवन, मुंबई,
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा/ अपिल शाखा), मुंबई /औरंगाबाद / नागपूर,
१७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / औरंगाबाद / नागपूर,
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
१९. महासंचालक, माहिती जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२०. सर्व विभागीय आयुक्त/ सर्व जिल्हाधिकारी,
२१. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,
२२. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
२३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२५. उपायुक्त (महिला विकास/ बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२६. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास,
२७. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
२८. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद,
२९. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी, नागरी, आदिवासी व ग्रामीण,
३०. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव/कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
३१. निवड नस्ती/का-१०.

शासन निर्णय क्र.आदिपु-२०२५/प्र.क्र.१५ /का-१०, दि.२२ मे, २०२५ चे

"परिशिष्ट"

| अ.क्र. | कामाचे विवरण | निर्देशांक (Indicators) | घटक (Unit) | मागील वर्ष (Baseline) | चालू वर्ष (Endline) | माहितीचा स्त्रोत आणि गुण देण्याचे निकष | एकूण गुण १३० |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | बाल विवाह प्रतिबंधक विषयक उपाययोजना करणे | बाल विवाह प्रतिबंधक उपाययोजना करुन गाव बाल विवाह मुक्त करणे | Present/ Absent | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) | | बाल विवाह प्रतिबंधक अधिकारी यांनी, गावबाल विवाह मुक्त प्रमाणित केल्यानुसार.<br>बाल विवाह झाला असल्यास- ० गुण<br>बाल विवाहझाला नसल्यास- १०गुण | १० |
| २ | सामुहिक विवाह सोहळयाचे आयोजन करणे | सामुहिक विवाह सोहळयाचे आयोजनकरुन सहभागी होणाऱ्या जोडप्यांच्या संख्येमध्ये वाढ करणे. | सामुहिक विवाह सोहळयामध्ये भाग घेतलेल्या एकूण जोडप्यांची संख्या | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान)<br>X= सामुहिक विवाह सोहळयामध्ये सहभागी झालेल्या जोडप्यांची एकूण संख्या | | ग्राम पंचायत यांचेकडून प्रमाणित करुन घेणे.<br>X= ० = ० गुण<br>X= ० ते ५ = ३ गुण<br>X= ६ ते १० = ५ गुण<br>X =१० पेक्षा जास्त = १०गुण | १० |
| ३ | हुंडा प्रथेस प्रतिबंध करणे | ग्रामपंचायत कार्यक्षेत्रामध्ये हुंडा न घेण्याची प्रथा रुढ करणे. | Present / Absent | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) | | स्थानिक पोलीस स्टेशनमधील/ पोलीस पाटील यांचेकडील नोंदी नुसार<br>प्रकरण नोंद असल्यास - ० गुण<br>प्रकरण नोंद नसल्यास - १० गुण | १० |

<table>
<tr>
<td>४</td>
<td>गाव कौटुंबिक हिंसाचार मुक्त करणे</td>
<td>गाव कौटुंबिक हिंसाचार मुक्त करण्याच्या प्रक्रियेस बळकटी देणे.</td>
<td>Present / Absent</td>
<td colspan="2">चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर मार्च या कालावधी दरम्यान)</td>
<td>तालुका संरक्षण अधिकाऱ्याच्याकडे असलेल्या नोंदीस अनुसरुन प्रमाणित करणे.<br>प्रकरण नोंद असल्यास - ० गुण<br>प्रकरण नोंद नसल्यास - १० गुण</td>
<td>१०</td>
</tr>
<tr>
<td>५</td>
<td>१०वी / १२वी उत्तीर्ण मुलींना कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देणे.</td>
<td>ग्रामपंचायत कार्यक्षेत्रातील १० वी / १२वी पास मुलींना कौशल्य विकासाच्या संधी उपलब्ध करुन देणे.</td>
<td>कौशल्य विकास प्रशिक्षणामध्ये भाग घेतलेल्या एकूण १०वी / १२वी पास मुलींची संख्या</td>
<td colspan="2">चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान)<br>X=कौशल्य विकास प्रशिक्षणामध्ये भाग घेतलेल्या एकूण मुलींची संख्या.<br>ग्रामपंचायतींचे वर्गीकरण:<br>अ: २००० पर्यंत लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत<br>ब: २,००० ते ५,००० दरम्यान लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत<br>क: ५,०००ते १०,००० दरम्यान लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत<br>ड: १०,००० च्या वर लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत</td>
<td>औद्योगिक प्रशिक्षण संस्थेने प्रमाणित केल्यानुसार
<table>
<tr><th>ग्रा. पं. चा प्रकार</th><th>० गुण</th><th>५ गुण</th><th>१० गुण</th></tr>
<tr><td>अ</td><td>X=०</td><td>X=१</td><td>X=२</td></tr>
<tr><td>ब</td><td>X=०</td><td>X=२</td><td>X=४</td></tr>
<tr><td>क</td><td>X=०</td><td>X=४</td><td>X=८</td></tr>
<tr><td>ड</td><td>X=०</td><td>X=६</td><td>X=१२</td></tr>
</table></td>
<td>१०</td>
</tr>
<tr>
<td>६</td>
<td>खाजगी / शासकीय नोकरीमध्ये कार्यरत तसेच स्वयंरोजगारामध्ये कार्यरत महिलांच्या संख्येचे प्रमाण जास्त</td>
<td>खाजगी / शासकीय नोकरीमध्ये कार्यरत तसेच स्वयंरोजगारामध्ये कार्यरत महिलांच्या संख्येचे प्रमाण वाढविणे</td>
<td>खाजगी / शासकीय नोकरीमध्ये कार्यरत तसेच स्वयंरोजगारामध्ये कार्यरत महिलांच्या संख्येच्या</td>
<td>A= मागील वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) खाजगी / शासकीय नोकरीमध्ये कार्यरत तसेच स्वयंरोजगारामध्ये कार्यरत महिलांची</td>
<td>B= चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) खाजगी / शासकीय नोकरीमध्ये कार्यरत तसेच</td>
<td>ग्राम पंचायत कडून प्रमाणित करुन घेणे.<br>X= (B-A)
<table>
<tr><th>ग्रा. पं. चा प्रकार</th><th>० गुण</th><th>५ गुण</th><th>१० गुण</th></tr>
<tr><td>अ</td><td>X=०</td><td>X upto ५</td><td>X more than ५</td></tr>
<tr><td>ब</td><td>X=०</td><td>X upto १०</td><td>X more than १०</td></tr>
</table></td>
<td>१०</td>
</tr>
</table>

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | असणारे गाव. | | प्रमाणामध्ये झालेला बदल | संख्या | स्वयंरोजगारामध्ये कार्यरत महिलांची संख्या | क: X=० ; X upto १५ ; X more than १५<br>ड: X=० ; X upto २० ; X more than २० | |
| | | | | **ग्रामपंचायतींचे वर्गीकरण:**<br>**अ**: २००० पर्यंत लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत<br>**ब**: २,००० ते ५,००० दरम्यान लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत<br>**क**: ५,०००ते १०,००० दरम्यान लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत<br>**ड**: १०,००० च्या वर लोकसंख्या असलेली ग्रामपंचायत | | | |
| ७ | नवीन बचत गट निर्मिती व सक्षमीकरण | ग्रामपंचायत कार्यक्षेत्रामध्ये जास्तीत जास्त महिलांना महिला बचत गटाचे सदस्यत्व मिळवून देणे व गट सक्षमिकरण | बचत गटामध्ये सहभागी झालेल्या नवीन महिला सदस्यांची एकूण संख्या | मागील वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान)<br>A= महिला गटामध्ये समाविष्ट झालेल्या एकूण महिला | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान)<br>B= महिला गटामध्ये समाविष्ट | माविम / MSRLM यांनी प्रमाणित केल्यानुसार<br>X = (B-A)<br>X= ० = ० गुण<br>X= ० ते ५ = ३ गुण<br>X= ६ ते १० = ५ गुण<br>X =१० पेक्षा जास्त = १० गुण | १० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | सदस्यांची संख्या. | झालेल्या एकूण महिला सदस्यांची संख्या. | | |
| ८ | गावामध्ये महिलांच्या नावे घर व शेत जमीनीचे फेरफार केल्याची संख्या | ग्रामपंचायत कार्यक्षेत्रामध्ये महिलांच्या नावे घर / शेत जमीन फेरफार करण्याची संख्या वाढविणे. | महिलांच्या नावे घर / शेत जमीनीचे फेरफाराची वाढलेली एकूण संख्या | मागील वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान)<br>A= घर / शेत जमीन महिलांच्या नावे केलेल्या एकूण प्रकरणांची संख्या | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान)<br>B= घर / शेत जमीन महिलांच्या नावे केलेल्या एकूण प्रकरणांची संख्या | १. ग्राम पंचायत नमुना नं.८ वर पडताळणी करुन<br>२. गाव कामगार तलाठी यांनी प्रमाणित केल्यानुसार<br>X= (B - A)<br>X= ० = ० गुण<br>X= ० ते ५ = ३ गुण<br>X= ६ ते १० = ५ गुण<br>X= १० पेक्षा जास्त = १०गुण | १० |
| ९ | आरोग्य तपासणी / हिमोग्लोबीन चाचणी करणे (सहा महिन्यातून एक वेळ ) | आरोग्य तपासणी/ हिमोग्लोबिन चाचणी करण्याच्या शिबिराचे सहा महिन्यातून एकवेळ आयोजन करणे | Organized/ Not Organized | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) | | समुदाय आरोग्य अधिकारी / आरोग्य सेविका यांनी प्रमाणित केल्यानुसार<br>शिबिराचे आयोजन केल्यास : १० गुण<br>शिबिराचे आयोजन न केल्यास: ० गुण | १० |
| १०. | संस्थांत्मक प्रसूती वाढविणे (Promote institutional delivery) | १०० % संस्थांत्मक प्रसूती करण्याचे प्रयत्न करणे. | Present/ Absent | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) | | समुदाय आरोग्य अधिकारी / आरोग्य सेविका यांनी प्रमाणित केल्यानुसार<br>१००% संस्थांत्मक प्रसूती झाली असल्यास- १० गुण<br>१००% संस्थांत्मक प्रसूती झाली नसल्यास- ० गुण | १० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ११ | गरोदर मातांची किमान चार ए.एन.सी. (ANC) तपासणी करणे | चार ए.एन.सी. (ANC) तपासणी केलेल्या गरोदर मातांची एकूण संख्या. | चार ए.एन.सी. (ANC) तपासणीचा लाभ १००% गरोदर मातांना मिळाला / मिळालानाही | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) | समुदाय आरोग्य अधिकारी / आरोग्य सेविका यांनी प्रमाणित केल्यानुसार.<br>१००% गरोदर मातांची किमान चार ए.एन.सी. (ANC) तपासणी झाली असल्यास- १० गुण<br>१००% गरोदर मातांची किमान चार ए.एन.सी. (ANC) तपासणी झाली नसल्यास- ० गुण | १० |
| १२ | गावामधील शाळाबाहय मुलींच्या संख्येवर नियंत्रण आणणे. | ग्रामपंचायत कार्यक्षेत्रातील सर्व मुली १०वी पर्यंत नियमित शाळेत जातील या बाबीवर लक्ष देणे. | एकूण शाळाबाहय मुलींची संख्या. | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) | मुख्याध्यापक / शिक्षक यांनी प्रमाणित केल्यानुसार<br>गावामध्ये शाळाबाहय मुली असल्यास- ० गुण<br>गावामध्ये शाळाबाहय मुली नसल्यास- १० गुण | १० |
| १३ | महिला स्नेही वातावरण निर्मिती करणे | महिला स्नेही वातावरण निर्मिती प्रशिक्षणाचे आयोजन ग्रामस्तरावर करणे. | प्रशिक्षण संपन्न झाले / नाही | चालू वर्षी (उदा: १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधी दरम्यान) | बाल विकास प्रकल्प अधिकारी यांनी प्रमाणित केल्यानुसार .<br>प्रशिक्षण झाले : १० गुण<br>प्रशिक्षण झाले नाही : ० गुण | १० |

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.05.22 17:27:04 +05'30'

( वि.रा.ठाकूर )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**